**सन २०१३-१४ या शैक्षणिक वर्षापासून प्रलंबित असणारी पात्र विद्यार्थ्यांची शिष्यवृत्तीची रक्कम अदा करण्याकरिता/ त्यामध्ये उद्भवणाऱ्या अडचणी /समस्यांचे निराकरण करण्याकरिता समिती गठीत करण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन

**विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागासप्रवर्ग कल्याण विभाग**

**शासन परिपत्रक क्र. विभशा-२०१८/प्र.क्र.१३६/शिक्षण**

मंत्रालय, विस्तार इमारत, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२,
दि. २९ सप्टेंबर, २०१८

<u>वाचा-</u> कक्ष अधिकारी, मुख्यमंत्री सचिवालय यांचे क्र. मुमंस/प्रशासन कक्ष/जा.क्र. २८८/२०१८, दि. २८.०८.२०१८

<u>प्रस्तावना-</u>

सन २०१३-१४ या शैक्षणिक वर्षापासून, राज्यातील विजाभज, इमाव व विमाप्र प्रवर्गातील पात्र विद्यार्थ्यांना शैक्षणिक शिष्यवृत्ती व अनुषंगीक लाभ प्रलंबित असल्याची बाब शासनाच्या निर्देशनात आली असल्यामुळे उच्च शिक्षण घेणाऱ्या राज्यातील विद्यार्थ्यांच्या प्रलंबित शैक्षणिक कर्ज आणि शिष्यवृत्तीची रक्कम अदा करण्याबाबत दि. ०२.०८.२०१८ रोजी मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली बैठक घेण्यात आली आहे. सदर बैठकीत झालेल्या निर्णयानुसार, शिष्यवृत्तीची रक्कम अदा करण्यास होणारा विलंब व संबंधित इतर अडचणी विचारात घेऊन समस्यांचे निराकरण करण्यासाठी संबंधित जिल्हाधिकारी यांचे अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.

**परिपत्रक-**

विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागासप्रवर्ग या प्रवर्गातील उच्च शिक्षण घेणाऱ्या पात्र विद्यार्थ्यांना सन २०१३-१४ या शैक्षणिक वर्षापासून प्रलंबित असणारी शिष्यवृत्तीची रक्कम अदा करण्याबाबत तसेच सदर योजनांची अंमलबजावणी करण्यामध्ये येणाऱ्या अडचणींचे निराकरण करण्याकरिता खालीलप्रमाणे जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली एक समिती नियुक्त करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. त्यानुसार सदर समिती खालील प्रमाणे राहील.

१. जिल्हाधिकारी - अध्यक्ष
२. संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे यांचे प्रतिनिधी - सदस्य
३. प्रादेशिक उपायुक्त (समाजकल्याण) - सदस्य
४. विभागीय तंत्र शिक्षण सहसंचालक अथवा त्या जिल्हयातील शासकीय अभियांत्रिकी/ शासकीय तंत्रनिकेतने यामधील प्राचार्य - सदस्य
५. विभागीय उच्च शिक्षण सहसंचालक अथवा त्या जिल्हयातील शासकीय महाविद्यालयातील प्राचार्य - सदस्य
६. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन यांचे प्रतिनिधी - सदस्य
७. जिल्हयातील/ कार्यक्षेत्रातील संबंधित क-षी व अकृषी विद्यापिठाचा प्रतिनिधी - सदस्य
८. जिल्हयातील नामवंत उच्च/तंत्र/वैद्यकीय /कृषी व अकृषी व इतर उच्च शिक्षण देणाऱ्या संस्थेचे प्रत्येकी प्रतिनिधी - सदस्य
९. जिल्हा आदिवासी विकास अधिकारी - सदस्य

१०. जिल्हा सहायक संचालक, जिल्हा कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन केंद्र - सदस्य
११. जिल्हा सहायक संचालक (समाजकल्याण) - सदस्य सचिव

**०२.** सदर समितीने विजाभज, इमाव व विमाप्र या प्रवर्गातील विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती/ निर्वाह भत्ता/ शिक्षण शुल्क/ परिक्षा शुल्क देय असणाऱ्या योजनांची माहिती लाभार्थ्यांपर्यत पोचण्याकरिता सर्व संस्थांमध्ये, जिल्हा कार्यालयांमध्ये जाहिरात/ सूचना फलक लावण्याबाबत सर्व संबंधितांना सूचना द्याव्यात.

**०३.** विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभागातंर्गत उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांच्या तसेच समितीने वर नमूद केलेल्या या दोन्ही योजनांच्या अंमलबजावणीच्या संदर्भात विद्यार्थ्यांकडून संस्थने प्रवेशाच्या वेळी १०० टक्के शिक्षण शुल्क मागणे, शुल्क नियामक प्राधिकरणाने निश्चित केलेल्या दरापेक्षा जादा शुल्क आकारणे, शिष्यवृत्तीखालील विद्यार्थी म्हणून प्रवेश नाकारने अशा स्वरुपाच्या प्राप्त होणाऱ्या तक्रारींचे निराकरण करावे.

**०४.** दिनांक ७ ऑक्टोंबर, २०१७ व दिनांक १ मार्च, २०१८ च्या शासन निर्णयान्वये इतर मागास प्रवर्गाकरीता शिष्यवृत्तीच्या लाभासाठी मान्य करण्यात आलेले अभ्यासक्रम संबंधित लाभार्थ्यांच्या निदर्शनास आणण्याकरीता आवश्यक त्या उपाय योजना समितीने कराव्यात.

**०५.** महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळाच्या तसेच वसंतराव नाईक विमुक्त जाती भटक्या जमाती विकास महामंडळ योजनेखालील शैक्षणिक कर्जाच्या प्रकरणाकरीता देण्यात आलेल्या LOI च्या अनुषंगाने जिल्हयातील विविध बँकांशी समन्वय साधून या प्रकल्पाकरीता चालना देण्याची कार्यवाही करावी.

**०६.** हे परिपत्रक निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून ४ दिवसांच्या आत समितीने पहिली बैठक आयेजित करावी व त्यानंतर दर १५ दिवसांनी या दोन्ही योजनांच्या अंमलबजावणीच्या प्रगतीचा आढावा घ्यावा.

**०७.** शैक्षणिक वर्ष २०१७-१८ पर्यंतची या विभागाच्या अथवा अन्य विभागाच्या अधिपत्याखालील विजाभज, इमाव व विमाप्र प्रवर्गातील पात्र लाभार्थ्यांना देय असलेल्या प्रलंबित शिष्यवृत्तीमुळे विद्यार्थ्यांना नाहक त्रास होऊ नये, त्यांचे गुणपत्र व इतर कागदपत्रे त्यांना विहित कालावधीत मिळावी याकरीता संबंधित सर्व विभागांच्या अधिकाऱ्यांच्या मदतीने दिनांक ३०/०९/२०१८ पर्यंत कॅम्पचे आयोजन समितीने करावे.

**०८.** जिल्हा मुख्यालयाच्या ठिकाणी कार्यरत असलेल्या उच्च/तंत्र/वैद्यकीय/कृषी इत्यादी संस्थांची अभ्यासक्रमांची प्रवेश क्षमता, त्यापैकी विजाभज, इमाव व विमाप्र प्रवर्गासाठी प्रत्यक्षात झालेले अथवा होणारे प्रवेश, या बाबींचा समग्र आढावा सदर समितीने घ्यावा.

**०९.** सदर परिपत्रकाच्या अनुषंगाने विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण, संचालनालय, पुणे यांनी त्यांच्या क्षेत्रीय कार्यालयांकरीता आवश्यक त्या पूरक सूचना तात्काळ प्रसारित कराव्यात.

**१०.** सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१८०९२९१७०६०४४९२२ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

Bhaurao Raghunath Gavit

Digitally signed by Bhaurao Raghunath Gavit
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=VJNT OBCS SBC Welfare Dept., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=692454783803b1bf08be0ff2505a01eb578c61edfbb827457be5704f5b440067, serialNumber=950bc6a64b0801087d4b403d7351619557bcd3489ca14b4e0f644bf05a04e89c, cn=Bhaurao Raghunath Gavit
Date: 2018.09.29 17:08:12 +05'30'

**(भा.र.गावित)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

**सर्व जिल्हाधिकारी**

**प्रत-**

१. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन प्रशासनीक विभाग.
२. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३. संचालक, उच्च शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य पुणे
४. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई
५. संचालक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण, पुणे
६. संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
७. आयुक्त, समाज कल्याण, पुणे
८. आयुक्त, कृषी संचालनालय, पुणे
९. आयुक्त, शालेय शिक्षण, पुणे
१०. सचिव, शुल्क नियामक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य,३०५, शासकीय तंत्रनिकेतन इमारत, ४९, खेरवाडी, अलियावर जंग मार्ग, वांद्रे (पूर्व), मुंबई ४०००५१.
११. सर्व सहसंचालक, तंत्र शिक्षण, विभागीय कार्यालये
१२. सर्व सहसंचालक, उच्च शिक्षण, विभागीय कार्यालये
१३. सर्व सहसंचालक, कला संचालनालय विभागीय कार्यालये
१४. सर्व सहसचिव/ उप सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
१६. मा.मंत्री, महसूल, मदत व पुनर्वसन, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून), कृषी, फलोत्पादन यांचे खाजगी सचिव
१७. मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे विशेष कार्य अधिकारी
१८. मा.राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव
१९. मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक
२०. निवड नस्ती (शिक्षण).